**बदली**
**उप अभियंता (स्थापत्य)**
**सा.बां.प्रा.वि,मुंबई/कोकण**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०२०/ प्र.क्र.११४ /सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १०.०८.२०२०

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई व कोकण अंतर्गत सर्वसाधारण बदलीस पात्र असलेल्या खालील तक्त्यात नमूद अधिका-यांची बदलीने पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १. | श्री.ए.जी.शेलार | सा.बां उप विभाग क्र.१, ठाणे | सा.बां.उप विभाग, पाचोरा |
| २. | श्रीमती कल्याणी र.गुप्ता | सा.बां.उप विभाग कोकण भवन, नवी मुंबई | दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई |
| ३. | श्री.मधूसुदन अ. नेवारे | सा.बां.उपविभाग क्र.२, पनवेल | सा.बां.उप विभाग, कोकण भवन, नवी मुंबई |
| ४. | श्री.निलेश शांताराम शिरसाठे | इमारती बांधकाम उप विभाग क्र.३, मुलुंड, मुंबई | बांधकाम उप विभाग क्र.१, मुलुंड |
| ५. | श्रीमती सुरेखा शिवाजी पवार | बांधकाम उप विभाग क्र.२, मुलुंड, मुंबई | इमारती बांधकाम उप विभाग क्र.३, मुलुंड, मुंबई |
| ६. | श्री.प्रसन्न प्रभाकर कुलकर्णी | बांधकाम उप विभाग क्र.१, मुलुंड, मुंबई | बांधकाम उप विभाग क्र.२, मुलुंड |
| ७. | श्री.चंद्रकांत अण्णापा कोळेकर | महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई | सा.बां.उप विभाग, कळमनुरी जि.हिंगोली |
| ८. | श्री.सुनिल सखाराम भालेराव | महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई | महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई |

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | सध्या कार्यरत असलेल्या कार्यालयाचे नांव | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| ९. | श्री.आर.एस.बोबडे | सहा.पत्तन अभि. पत्तन उप विभाग, वांद्रे, मुंबई | सहा.पत्तन अभियंता, पत्तन उप विभाग, ठाणे |
| १०. | श्री.निरज उध्दव चोरे | सहा.पत्तन अभियंता, पत्तन उप विभाग, ठाणे | सहा.पत्तन अभि. पत्तन उप विभाग, वांद्रे,मुंबई |
| ११. | श्री.संजय ल.कुलकर्णी | जि.प.(बां) उप विभाग, पालघर | उप अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, अहमदनगर |
| १२. | श्रीम.हे.बा.कांबळे | उप अभियंता, पुल घटक क्र.१, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन | इमारत घटक,संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई |
| १३. | श्रीम.अ.मा.सोनबरसे | पुल घटक क्र.१, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन | इमारत घटक क्र.१, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई |
| १४. | श्रीम.प्रा.नि.नाईक | पुल घटक क्र.१, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन | इमारत घटक क्र.२, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई |
| १५. | श्री.वि.प्र.सपकाळ | इमारत घटक,संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई | पूल घटक क्र.३, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई |
| १६. | श्रीम.अंजली वैद्य | इमारत घटक क्र.१, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई | पूल घटक क्र.३, संकल्पचित्र मंडळ, कोकण भवन ,नवी मुंबई |
| १७. | श्री.यु.बी.निकम | उप अभियंता, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, ठाणे | उप अभियंता,प्रधानमंत्री ग्राम सडक योजना, नाशिक |

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी उपरोक्त उप अभियंता यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. उपरोक्त उप अभियंता यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल. तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत/ मंजूर करु नयेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०१६०९२०५७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Patil Swati Sachin

Digitally signed by Patil Swati Sachin
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, serialNumber=41a9218232bbaea65861213d86d108ea7c48905da5f33dba9c8f6662cb8f9e18, cn=Patil Swati Sachin
Date: 2020.08.10 16:19:22 +05'30'

**(स्वा.स.पाटील)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल १/२ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर

२. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर

४. सह सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई

५. अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र ( इमारती व पूल) मंडळ, कोकण भवन, नवी मुंबई

६. व्यवस्थापकीय संचालक (प्रशा), महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई

७. प्रशासकीय अधिकारी,महाराष्ट्र चित्रपट रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई

८. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे/मुंबई

९. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव/रायगड/हिंगोली/पालघर/अहमदनगर/नाशिक

१०. सर्व संबंधित उप अभियंता यांना संबंधित मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्या मार्फत.

११. मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम)/ मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२. अपर मुख्य सचिव (सा.बां.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.

१३. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.